कालमर्यादा

शासकीय कर्मचा-यांचा सर्वंकष माहितीकोष तयार करणेबाबत.
Employees Master Database (EMDb)

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : असांसं १३२०/३५८/प्र.क्र. ६१/का-१४१७**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २७ ऑगस्ट, २०२०.

**परिपत्रक:**

अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई या कार्यालयाकडून महाराष्ट्र शासनाच्या सेवेतील सर्व कर्मचाऱ्यांचा सर्वंकष माहितीकोष दरवर्षी अद्ययावत करण्याची कार्यवाही हाती घेण्यात आली आहे. या माहितीकोषामध्ये नियमित आस्थापनेवरील कर्मचारी व नियमितेतर आस्थापनेवरील कर्मचारी (कार्यव्ययी आस्थापनेवरील, रोजंदारीवरील, अंशकालीन, मानसेवी इत्यादी) तसेच तदर्थ तत्वावर नेमणुका करण्यात आलेले कर्मचारी अशा सर्व प्रकारच्या कर्मचाऱ्यांची माहिती गोळा करण्यात येणार आहे. त्या आधारे सर्व भरलेल्या व रिक्त पदांच्या माहितीचा समावेश असलेला सर्वंकष माहितीकोष (Employees Master Database- EMDb) अद्ययावत करण्यात येत आहे. त्या अनुषंगाने दिनांक १ जुलै, २०२० या संदर्भ दिनांकास कर्मचाऱ्यांचा सेवार्थ I.D., भविष्य निर्वाह निधी / DCPS खाते क्रमांक, पॅन क्रमांक, कर्मचाऱ्याचे नाव, जन्मदिनांक, सेवेत रुजू झाल्याचा दिनांक, निवृत्तीचा दिनांक, लिंग, सामाजिक प्रवर्ग, धर्म, स्वग्राम, दिव्यांग असलेली व्यक्ती, इ. स्थायी स्वरूपाची माहिती तसेच आश्वासित प्रगती योजना इत्यादी माहिती गोळा करण्यात येणार आहे. तसेच जुलै, २०२० या संपूर्ण महिन्याच्या वित्तलब्धीची तपशिलवार माहितीही गोळा करण्यात येणार आहे. माहिती नोंदणीकरिता अर्थ व सांख्यिकी संचालनालयाकडून संगणकीय ऑनलाईन आज्ञावली तसेच लॉग-इन आयडी व पासवर्ड आणि माहिती भरण्याचे व आज्ञावली वापरण्यासंबंधीचे सूचनासंच संबधित कार्यालयांना उपलब्ध करून देण्यात येईल. शासकीय कर्मचाऱ्यांचा सर्वंकष माहितीकोष-२०२० (Employees Master Database - EMDb २०२०) विहित वेळेत अद्ययावत करण्यासाठी व त्याची कार्यवाही योग्य प्रकारे पार पाडण्यासाठी राज्य शासनाचे आहरण व संवितरण अधिकारी, यांनी पुढील वेळापत्रक व सूचना विचारात घेऊन त्यानुसार कार्यवाही करावी.

**वेळापत्रक**

| तपशील | कालावधी |
|---|---|
| Login Id व password अर्थ व सांख्यिकी संचालनालयाने उपलब्ध करणे | दिनांक १ सप्टेंबर, २०२० ते दिनांक १५ सप्टेंबर, २०२० |
| आहरण व संवितरण अधिका-याने माहिती सादर करणे व पहिले प्रमाणपत्र प्राप्त करुन घेणे | दिनांक १६ सप्टेंबर, २०२० ते दिनांक १५ डिसेंबर, २०२० |
| आहरण व संवितरण अधिका-याने त्रुटीचे निवारण करून माहिती बरोबर असल्याचे दुसरे प्रमाणपत्र प्राप्त करुन घेणे | दिनांक १६ डिसेंबर, २०२० ते दिनांक १७ मार्च, २०२१ |

२. आहरण व संवितरण अधिका-यांसाठी सूचना

अ) राज्य शासकीय कार्यालयांतील प्रत्येक आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित प्रादेशिक / जिल्हा सांख्यिकी कार्यालयाकडून ऑनलाईन आज्ञावलीकरीता लॉग-इन आय.डी. व पासवर्ड उपलब्ध करून घ्यावे. सदर माहितीकोषासाठी संबंधित कार्यालयातील कर्मचाऱ्यांची माहिती दिनांक १ जुलै, २०२० या संदर्भ दिनांकास अनुसरून अद्ययावत करण्यासाठी Employees Master Database २०१९ मधील प्रणालीमध्ये त्यांच्या कार्यालयाने भरलेली माहिती आधारभूत माहिती राहील. माहिती भरण्याचे सूचनासंच ऑनलाईन आज्ञावलीमध्ये उपलब्ध करून दिले जातील.

आ) राज्य शासनाच्या कार्यालयांची आहरण व संवितरण अधिकारीनिहाय माहिती ऑनलाईन स्वरुपात संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना अद्ययावत करण्यासाठी उपलब्ध करुन देण्यात येत आहे. ज्या कर्मचाऱ्यांच्या माहितीचा समावेश आधारभूत माहितीत असून ते दिनांक १ जुलै, २०२० या संदर्भ दिनांकास संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या कार्यकक्षेत येत आहेत, अशा कर्मचाऱ्यांची संगणकीय ऑनलाईन आज्ञावलीमध्ये माहिती अद्ययावत करावयाची आहे. याशिवाय, नवीन कर्मचाऱ्यांची (जसे बदली होऊन आलेले अथवा नवीन नेमणूक झालेले, इ.) माहिती आणि आधारभूत माहितीत समाविष्ट नसलेल्या तथापि दिनांक १ जुलै, २०२० रोजी आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या कार्यकक्षेत असलेल्या कर्मचाऱ्यांची माहिती देखील या संचालनालयाने दिलेल्या ऑनलाईन आज्ञावलीमध्ये भरावयाची आहे.

इ) जुलै महिन्यात स्वेच्छानिवृत्ती घेतलेल्या कर्मचाऱ्यांच्या बाबतीत ते जर दिनांक १ जुलै, २०२० रोजी राज्य शासनाचे कर्मचारी असतील तर जुलै महिन्यात त्यांच्यावर शासनाचा निधी खर्ची पडला असल्याने, अशा कर्मचाऱ्यांचा देखील समावेश माहितीकोषात करावा.

ई) उपलब्ध करून दिलेल्या ऑनलाईन आज्ञावलीच्या सूचनासंचात तसेच युजर मॅन्युअलमध्ये दिलेल्या सूचनांचे पालन करून योग्य रीतीने कर्मचाऱ्यांची माहिती नोंदणी करावयाची आहे. माहिती नोंदणी करताना कार्यकक्षेत येणा-या सर्व कर्मचाऱ्यांची <u>माहिती नोंदणी करण्याची दक्षता आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावयाची आहे.</u> अशा प्रकारे ऑनलाईन नोंदणी पूर्ण केल्यानंतर माहिती प्राप्त झाल्याचे प्रमाणपत्र जिल्हा सांख्यिकी कार्यालय / प्रादेशिक कार्यालय यांचेकडून संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना उपलब्ध करुन देण्यात येईल. माहे डिसेंबर, २०२० च्या वेतन देयकासोबत (December २०२० to be paid in January २०२१) अशा प्रकारचे प्रमाणपत्र जोडले नसल्यास माहे डिसेबर, २०२० ची वेतन देयके कोषागार कार्यालय / अधिदान व लेखा कार्यालयात स्वीकारली वा पारित केली जाणार नाहीत. प्रमाणपत्राशिवाय कोषागार कार्यालयांनी वेतन देयक पारित करू नयेत.

उ) शासकीय कार्यालयांनी उपलब्ध करुन दिलेल्या माहितीची तपासणी संबंधित जिल्हा सांख्यिकी कार्यालये करतात व प्रादेशिक कार्यालये यांच्याकडून संनियंत्रण करण्यात येते. संबंधित आहरण व संवितरण अधिका-यांना सदर माहितीमधील त्रुटी दुरूस्त करण्यासाठी दिनांक १६ डिसेंबर, २०२० ते दिनांक १७ मार्च, २०२१ हा कालावधी देण्यात येत आहे. संबंधित कार्यालयाकडून त्रुटींचे निराकरण झाल्यानंतर लगेच माहिती तपासल्याचे प्रमाणपत्र उपलब्ध करुन देण्यात येईल. हे दुसरे प्रमाणपत्र माहे मार्च, २०२१ च्या वेतन देयकासोबत (March, २०२१ to be paid in April २०२१) जोडून वेतन देयके कोषागारात सादर करावयाची आहेत. अशा प्रकारचे माहिती तपासल्याचे प्रमाणपत्र मार्च, २०२१ च्या वेतन देयकासोबत जोडले नसल्यास वेतन देयके कोषागारात स्वीकारण्यात येणार नाहीत. प्रमाणपत्राशिवाय कोषागार कार्यालयांनी वेतन देयके पारित करु नयेत.

ऊ) ज्या शासकीय कार्यालयांची वेतन देयके कोषागारात सादर होत नाहीत, अशा सर्व कार्यालयांनीसुध्दा त्यांच्या कर्मचाऱ्यांची व रिक्त पदांची माहिती ऑनलाईन आज्ञावलीद्वारे नोंदणी करून जिल्हा सांख्यिकी अधिकारी यांच्याकडे दिनांक १६ सप्टेंबर, २०२० ते दिनांक १५ डिसेंबर, २०२० या कालावधीत सादर करावी.

ए) कोरोना विषाणूचा (COVID-१९) प्रसार राज्य शासकीय कार्यालयामध्ये होऊ नये, तसेच राज्यातील अधिकारी / कर्मचारी यांना त्याचा संसर्ग होऊ नये म्हणून शासन परिपत्रक क्रमांक समय-२०२०/प्र.क्र. ३५/१८ (र.व का.) दिनांक २५ जून, २०२० अन्वये केंद्र शासनाच्या माहिती तंत्रज्ञान मंत्रालयाने प्रसिध्द केलेल्या ई-मेल पॉलिसीनुसार केंद्र शासनांतर्गत नॅशनल इनफॉर्मेटिक्स सेंटर (NIC) यांनी उपलब्ध करून दिलेल्या शासकीय ई-मेल सेवेचा वापर राज्य शासनाच्या कामकाजात करणे बंधनकारक आहे.

३. ऑनलाईन संगणकीय आज्ञावलीमध्ये माहिती भरण्यात काही अडचणी आल्यास संबंधितांनी जिल्हा सांख्यिकी कार्यालये / प्रादेशिक कार्यालये यांच्याशी संपर्क साधून त्याबाबत खुलासा प्राप्त करून घ्यावा. सर्व कार्यालयांनी कार्यवाही विहीत वेळेत पूर्ण होण्याकरिता लॉग - इन आय. डी. व पासवर्ड वेळापत्रकानुसार प्राप्त करून घ्यावे.

४. सर्व कोषागार / उप कोषागार अधिकाऱ्यांनी माहितीकोषाच्या कामी अर्थ व सांख्यिकी संचालनालयास संपूर्ण सहकार्य देऊन माहितीकोषाबाबत जी कार्यवाही अपेक्षित असेल ती पार पाडावी. माहिती अद्ययावत झाल्याबाबतचे अर्थ व सांख्यिकी संचालनालयाने दिलेले प्रमाणपत्र माहे डिसेंबर, २०२० च्या वेतन देयकासोबत व त्यातील माहिती बरोबर असल्याबाबतचे प्रमाणपत्र माहे मार्च, २०२१ च्या वेतन देयकासोबत जोडलेले नसल्यास अशा कार्यालयांची देयके अधिदान व लेखा कार्यालयाने / कोषागाराने न स्वीकारता संबंधित कार्यालयांना ती योग्य त्या पूर्ततेसाठी परत पाठवावीत. मात्र जे राज्य शासकीय कर्मचारी नाहीत अशांच्या वेतन देयकांबाबत ही कार्यवाही लागू नाही. (उदा. मा. राज्यपाल, आमदार, मंत्रिमंडळाचे सर्व सदस्य इ.)

५. कोषागारे / उप कोषागारे अधिकाऱ्यांनी वरील सूचना तातडीने सर्व आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या निदर्शनास आणाव्यात.

६. सदर परिपत्रक वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १८०/२०२०/कोषा प्रशा-५ दिनांक ३१-७-२०२० अन्वये नियोजन विभागास प्रदान करण्यात आलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२००८२८१४१३३८४४१६ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADNYA MAHALE

Digitally signed by PRADNYA MAHALE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=31c8683f52ccbefd97bce49983c4151d2caf1c185c657ea855ac85f31e5f681e, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=f0b9244e8f45f12e0a399cd036d6d3767c67c8349951e3e5047b7469a24cdfb2, ou=PLANNING DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=PRADNYA MAHALE
Date: 2020.08.28 15:30:50 +05'30'

**( प्रज्ञा महाले )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. विरोधी पक्ष नेते, विधान सभा / विधान परिषद, विधान भवन, मुंबई-३२
२) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
३) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२
५) सर्व मंत्रालयीन विभाग, यांना विनंती करण्यात येते की, त्यांच्या अधिनस्त सर्व विभाग प्रमुख / सर्व कार्यालय प्रमुख, सर्व संचालनालये यांना या अनुषंगाने कळविण्यात यावे.
६) प्रधान सचिव, वित्त विभाग /कोषा प्रशा-५, मंत्रालय, मुंबई -३२
७) * सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
८) * सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
९) * प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त कार्यालय, मुंबई-३२
१०) प्रबंधक, मूळ / ॲपिलेट शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
११) जिल्हाधिकारी (सर्व)
१२) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
१३) संचालक, शासकीय मुद्रण व लेखन सामग्री, संचालनालय, मुंबई
१४) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१५) सर्व प्रादेशिक सह संचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय
१६) सह संचालक, लेखा व कोषागारे, कोकण / पुणे / नाशिक / औरंगाबाद / नागपूर / अमरावती
१७) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई-३२
१८) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
१९) सर्व कोषागार / उप कोषागार अधिकारी
२०) सर्व जिल्हा सांख्यिकी अधिकारी, जिल्हा सांख्यिकी कार्यालय
२१) निवड नस्ती (का-१४१७), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

* पत्राने